राज्य योजना सन २०२४-२५

**हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे- राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या योजनेतर्गत निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी- ०४.२४/प्र.क्र.९३/फ-१**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक :- ११ जुन, २०२४.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४.

२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२३/७५/२०२४-२५/दिनांक २४.०४.२०२४.

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ आर्थिक वर्षाकरिता हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे- राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ११५००.०० लक्ष नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रकान्वये सन २०२४-२५ मध्ये निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना जारी करण्यात आल्या आहेत.

संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये सन २०२४-२५ करीता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर व यांनी हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे- राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या योजनेतंर्गत रू. १३९.२२ लक्षचे प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केले असून त्या अनुषंगाने शासन पुढील निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक १ चे परिपत्रक विचारात घेता अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका क्रमांक ५५६३/२०२२ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिनांक २६.१०.२०२३ रोजी पारित केलेल्या आदेशाच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने संबंधीत व्यक्तीस मोबदला अदा करण्याकरिता संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे- राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (२४०६-२२४१) या लेखाशिर्षांतर्गत “५०- इतर खर्च” या उदिष्टाखाली **रु. १३९.२२ लक्ष** इतका निधी खालील अटी व शर्तीचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

I. प्रस्तावीत खर्च:- लेखाशिर्ष २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीवांचे संवर्धन (००) (११) हक्क व विशेषाधिकार निर्धारीत करणे-राष्ट्रीय उद्याने आणि अभयारण्य परिसरातील गावांचे पुनर्वसन (राज्य) (२४०६-२२४१) या लेखाशिर्षांमधील ५०-इतर या उद्दिष्टांतर्गत सन २०२४-२५ मध्ये अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध होणा-या अनुदानातून खर्च करण्यात यावा.

II. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

III. सदरच्या खर्चाच्या अनुषंगाने आवश्यक असलेले लेखे व्यवस्थित/अचूक ठेवण्याबाबत दक्षता घ्यावी.

IV. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावातील बाबींची निकड लक्षात घेवून अर्थसंकल्प अंदाज, वितरण व सनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वर उपलब्ध निधीच्या मर्यादेत निधी वाटप करावा.

V. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१.०४.२०२४ चे काटेकोर पालन करावे.

२. सदरचा शासन निर्णय नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक:- १७१/२०२४/१४७५, दिनांक २४.०५.२०२४ व वित्त विभाग, अनौपचारी संदर्भ क्रमांक २२०/२०२४/व्यय-१०, दिनांक ०४.०६.२०२४ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१३१६४४००२७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2024.06.13 16:57:18 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व, नागपुर.
५. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.
६. महालेखापाल१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
७. फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*******